**को. प. बंधारा. आंबडस ता. खेड जि. रत्नागिरी या योजनेच्या विशेष दुरुस्ती अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता.**

**महाराष्ट्र शासन**

**जलसंपदा विभाग,**

**शासन निर्णय क्रमांक : प्रमाप्र-२०२३/ (प्र.क्र.९९/२०२३)/ सिंव्य(कामे)**

मंत्रालय, मुंबई-४०००३२

दिनांक:- ३ एप्रिल, २०२५

**वाचा:-**

१. कार्यकारी संचालक कोंकण पाटबंधारे विकास महामंडळ, ठाणे, यांचे पत्र.जा.क्र.कोंपाविम/अंबडस-१२२२/(प्र.क्र.०४/तां-७/५२२ दिनांक १५/०२/२०२३.
२. शासन निर्णय - २०१७/५६६/१७/सिंव्य(कामे), दि.३१/०८/२०१८.
३. शासन निर्णय - २०१८/५५१/१७/सिंव्य(कामे), दि.२७/११/२०१८.
४. शासन निर्णय - २०१३/७८५/१३/सिंव्य (कामे),दि १/८/२०१९.
५. शासन परिपत्रक- प्रमा २०१३/७८५/१३/ सिंव्य (कामे),दि.१६/९/२०२१.
६. शासन परिपत्रक क्र-प्रमा २०१३/(७८५/१३)/ सिंव्य (कामे),दि १/१/२०१५.
७. शासन निर्णय क्रमांक संकिर्ण-२०२२/प्र.क्र.५१६/२०२२/सिंव्य(कामे),दि१४/०३/२०२३.

**प्रस्तावना :-**

मुंबई -गोवा महामार्गावरील चिपळूण पासून ३ कि.मी. अंतरावर असलेल्या कळंबस्ते फाट्यापासून अंदाजे ८ कि.मी. अंतरावर असणा-या आंबडस गावातील वाशिष्ठी नदीच्या उपनाल्यावर सन १९७४ मध्ये दगडी बांधकामात बंधारा बांधण्यात आलेला आहे. आंबडस ता.खेड जि. रत्नागिरी येथील कोकण पध्दतीच्या बंधा-यास शासन निर्णय क्र एम आय डब्लु/१७७०/५२५६/एम. आय. (१) दि ३०.६.१९७१ अन्वये रु ३.०४ लक्ष किंमतीस मूळ प्रशासकीय मान्यता मिळाली आहे. या बंधा-याच्या रु ५.०६ लक्ष किंमतीचा पूर्णत्व अहवाल महालेखपाल नागपूर यांचेकडे मंजूरीसाठी सादर केला आहे. बंधा-याचा एकूण पाणीसाठा ०.८२१ द.ल.घ.मी. असून पर्जन्योत्तर प्रवाहासह एकूण पाणीसाठा १.२१७ द.ल.घ.मी. इतका आहे. बंधा-याची एकूण लांबी १२२ मी असून त्यास एकूण ३५ स्तंभ व ३६ गाळे आहेत. या को.प. बंधा-याचे लाभक्षेत्र १२० हेक्टर इतके असून खाजगी उपसा सिंचनाद्वारे खेड तालुक्यातील आंबडस -केळणे, काडवली व चिपळूण तालुक्यातील पाली या गावातील क्षेत्र ओलिताखाली आलेले आहे.

सदरचा को.प.बंधा-याचे बांधकाम दगडी बांधकामात असून, बंधा-याच्या बांधकामामधून व पायातून मोठ्या प्रमाणात गळती असल्याने बंधा-यात पाणीसाठा होत नाही. बंधा-याच्या पायातील दोन्ही बाजूच्या दगडी बांधकामाचा व गाळ्याच्या खांबाच्या बांधकामाचे मॉर्टर निघून गेल्याने व झाडे झुडपे वाढल्यामुळे बांधकामाचे सांधे निखळले/ खिळखिळे झालेले आहेत. या बंधा-यावरील आर.सी.सी. स्लॅबचा पृष्ठभाग ओबडधोबाड झाला असून उजव्या बाजूच्या २० खांबा पुढील स्लॅब तुटलेला आहे.सदर स्लॅब मधील लोहसळई तळाखालच्या बाजूने उघड्या पडलेल्या असून त्यास गंज लागलेला आहे. सदर बंधा-यामध्ये सन २००२-०३ पासून पाणीसाठा होत नाही.

सदर को.प.बंधा-याची दुरुस्ती व नुतनीकरण पूर्ण झाल्यानंतर पाणीसाठा पुनर्स्थापित होवून उपसा सिंचनाद्वारे खेड तालुक्यातील आंबडस -केळणे, काडवली व चिपळून तालुकयातील पाली या गावातील १२० हेक्टर लाभक्षेत्र ओलिताखाली येणार आहे

या पार्श्वभूमीवर बंधा-याच्या सुरक्षिततेच्या दृष्टीने दुरूस्ती होणे आवश्यक असल्याने को. प. बंधारा आंबडस ता.खेड , जि.रत्नागिरी या योजनेच्या दुरूस्ती कामास विशेष दुरूस्ती अंतर्गत प्रशासकीय मान्यता देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. त्याअनुषंगाने शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णयः-**

कोंकण पाटबंधारे विकास महामंडळ, ठाणे अंतर्गत को. प. बंधारा आंबडस ता.खेड , जि.रत्नागिरी या को. प. बंधा-यांच्या विशेष दुरूस्ती कामाच्या रू.४,३३,४०,८८६/- (रू.चार कोटी तेहतीस लक्ष चाळीस हजार आठशे शहाऐंशी फक्त) एवढ्या खर्चाच्या प्रस्तावास खालील अटींच्या अधीन राहून सोबतच्या प्रपत्रानुसार प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

१) तांत्रिक मान्यता,निविदा प्रक्रिया,कामाचे नियोजन व पूर्णत्व, प्रशासकीय मान्यतेच्या मर्यादेत खर्च करणे इ. बाबींसाठी प्रचलित शासन निर्णय / परिपत्रके यांचे पालन करणे बंधनकारक राहिल.
२) प्रस्तावित कामांमुळे होणाऱ्या खोदकाम तोडफोड याव्दारे उपलब्ध होणारे बांधकाम साहित्याचा पूर्ण वापर करुन बचत साधावी.

३) सदर अंदाजपत्रकातील कामांसाठी कोणत्याही प्रयोजनार्थ सर्वसाधारणपणे मंजूर प्रशासकीय मान्यतेच्या मर्यादेबाहेर जाऊन, निधी वितरण अथवा अतिरिक्त खर्च करता येणार नाही.
४) सदर दुरूस्ती काम सुरु करण्यापूर्वी लाभक्षेत्रांतर्गत पाणी वापर संस्था स्थापित करून दुरुस्ती काम पूर्ण झाल्यानंतर लाभक्षेत्र हस्तांतरित करण्याची संपूर्ण जबाबदारी क्षेत्रिय कार्यकारी अभियंता यांची राहील.
५) प्रशासकीय मान्यता म्हणजे अहवालातील तांत्रिक बाबी अथवा निविदा विषयक क्षेत्रीय स्तरावरील निर्णयास मान्यता गृहीत धरली जाणार नाही.
६) प्रत्यक्ष काम सुरु करण्यापूर्वी संकल्पनास सक्षम स्तरावर मान्यता घ्यावी.
७) प्रस्तावित दुरस्तीकामांद्वारे १२०.०० हेक्टर सिंचन क्षेत्र पुनर्स्थापित करण्याची जबाबदारी क्षेत्रिय अधिकारी यांची राहील.

प्रस्तावित कामासाठी होणारा खर्च ४७०२ लघु पाटबंधारे प्रकल्प यावरील भांडवली खर्च, ८०-सर्वसाधारण, १९०-सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमातील गुंतवणुका विशेष दुरूस्ती / विस्तार व सुधारणा कार्यक्रमा अंतर्गत भाग भांडवली अंशदान (००)(१६) कोंकण पाटबंधारे विकास महामंडळ, ठाणे भाग भांडवली अंशदान (उर्वरीत महाराष्ट्र) (कार्यक्रम) (४७०२ ७४६१) (योजनांतर्गत) ५४ गुंतवणुका या लेखाशिर्षा खाली टाकुन मंजुर अनुदानातुन भागवावा.

या कामास प्रदान करण्यात आलेली प्रशासकीय मान्यता सिंव्य (कामे) कार्यासनाच्या नोंदवही मध्ये क्र. ०१ सन २०२५-२६ मध्ये नोंदविण्यात आलेली आहे.

सदर शासन निर्णय संकेतस्थळावरwww.maharashtra.gov.inउपलब्ध करण्यात आला असून त्यांचा संगणक संकेतांक २०२५०४०३१७०००९११२७ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

NAMITA GAURAV BASER

Digitally signed by NAMITA GAURAV BASER
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER RESOURCES DEPARTMENT, 2.5.4.20=8ee2809da7de03ff444cfa186d623a75fac5db94fb5c9de45f8a05b5f4b6fb7f, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=69D010EE03D01B7C859C5458FEEAF66B1EAE16BC67F5CCB127AE66608DE5FA48, cn=NAMITA GAURAV BASER
Date: 2025.04.03 17:02:06 +05'30'

**( न. गौ. बसेर )**
**शासनाच्या उपसचिव**

**सोबत : सहपत्र**

**प्रत:-**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव,
२) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
३) मा.उपमुख्यमंत्री (वित्त /नगरविकास) यांचे प्रधान सचिव,
४) मा.अध्यक्ष/उपाध्यक्ष, विधानसभा, विधानभवन, मुंबई
५) मा. सभापती/उपसभापती, विधानपरिषद, विधानभवन, मुंबई

६) मा.मंत्री, जलसंपदा (गोदावरी व कृष्णा खोरे विकास महामंडळ) यांचे स्वीय सहाय्यक.

७) मा.मंत्री, जलसंपदा (विदर्भ, तापी व कोंकण खोरे विकास महामंडळ) यांचे स्वीय सहाय्यक.

८) मा.विरोधी पक्षनेते, विधानसभा,मुंबई यांचे कार्यालय, विधानभवन, मुंबई

९) मा.विरोधी पक्षनेते, विधानपरिषद ,मुंबई यांचे कार्यालय, विधानभवन, मुंबई

१०)अपर मुख्य सचिव, (वित्त) वित्त विभाग, मंत्रालय,मुंबई,

११) अपर मुख्य सचिव, (नियोजन) नियोजन विभाग,मंत्रालय,मुंबई,

१२) अपर मुख्य सचिव, (जलसंपदा) जलसंपदा विभाग,मंत्रालय,मुंबई,

१३) सचिव (जसंव्य व लाक्षेवि), जलसंपदा विभाग,मंत्रालय,मुंबई,

१४) सचिव (प्रकल्प समन्वय), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई,

१५) महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा),महाराष्ट्र राज्य,मुंबई,

१६) महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा),महाराष्ट्र राज्य,नागपूर,

१७) कार्यकारी संचालक, कोंकण पाटबंधारे विकास महामंडळ, ठाणे

१८) मुख्य अभियंता,जलसंपदा विभाग, कोंकण प्रदेश ,मुंबई

१९) आंतर वित्त सल्लागार व सहसचिव, जलसंपदा विभाग,मंत्रालय,मुंबई,

२०) अधीक्षक अभियंता,रत्नागिरी पाटबंधारे मंडळ, रत्नागिरी

२१) कार्यकारी अभियंता, रत्नागिरी पाटबंधारे विभाग, रत्नागिरी

२२) सिं.व्य.(कामे)कार्यासन संग्रहार्थ.

**शासन निर्णय क्रमांक : प्रमाप्र-२०२३/ (प्र.क्र.९९/२०२३)/ सिंव्य (कामे),**

**दि. ३/४/ २०२५ चे सहपत्र**

| **Sr.No.** | **Description of Item** | **Amount in ( Rs. )** |
|---|---|---|
| 1 | C - Works (excluding Royalty) | 35363431 |
| 2 | Royalty | 1258403 |
| 3 | १ % Insurance | 353634 |
| 4 | १८ % GST | 6365418 |
| 7 | **Total Rs.** | रू. 4,33,40,886 |

NAMITA GAURAV BASER

Digitally signed by NAMITA GAURAV BASER
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER RESOURCES DEPARTMENT, 2.5.4.20=8ee2809da7de03ff444cfa186d623a75fac5db94fb5c9de45f8a05b5f4b6fb7f, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=69D010EE03D01B7C859C5458FEEAF66B1EAE16BC67F5CCB127AE66608DE5FA48, cn=NAMITA GAURAV BASER
Date: 2025.04.03 17:02:28 +05'30'

**(न.गौ.बसेर)**
**शासनाच्या उपसचिव**